सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील नोव्हेंबर, २०१८ च्या अधिवेशनात पूरक मागणीव्दारे अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमसीओ-२०१८/प्र.क्र.२५४/नवि-१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ फेब्रुवारी, २०१९

वाचा:- १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.१९१/नवि-१४, दि.१६.०६.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.३५८/नवि-१४, दि.१६.०४.२०१८.
४) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.३५८/नवि-१४, दि.१६.१०.२०१८.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.-पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि.०५.१२.२०१८.
६) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र.पुरक-२०१८/प्र.क्र.१८०/नवि-४, दि.१७.१२.२०१८.
७) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.२५४/नवि-१४, दि.०४.०१.२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान वितरीत करण्यात येते. सदर प्रयोजनार्थ सन २०१८-१९ करीता रक्कम रू.१४९१.०० कोटी वित्त विभागाने अर्थसंकल्पित केलेले आहेत. त्यापैकी ७०% निधी रु. १०४३.७० कोटी इतका निधी संदर्भिय क्र.३ येथील दि.१६.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिला होता व तद्नंतर उर्वरित ३०% निधी रू.४४७.३० कोटी इतक्या निधीपैकी रु.४४१.२४२५ कोटी इतका निधी संदर्भिय क्र.४ येथील दि.१६.१०.२०१८ च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. तसेच, नोव्हेंबर, २०१८ च्या अधिवेशनात पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित रु.२०० कोटी निधीपैकी ७०% निधी रु.१४० कोटी इतका निधी संदर्भिय क्र.७ येथील दि.०४.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेला आहे.

आता, नोव्हेंबर, २०१८ च्या अधिवेशनात पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित रु.२०० कोटी निधीपैकी उर्वरित ३०% निधी रु.६० कोटी इतका निधी वित्त विभागाने BEAMS प्रणालीवर वितरीत केला आहे. त्यानुसार, सदर निधी वितरीत करण्यापूर्वी वित्त विभाग दि.०२.०४.२०१८ मध्ये विहित केलेल्या अटींची पुर्तता झाल्यावरच संबंधित नगरपरिषद/नगरपंचायतींना वितरीत करावयाचा आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान देण्यात येते. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता नगरपरिषदांना अनुदान कमी पडत असल्याने, नोव्हेंबर,२०१८ च्या अधिवेशनात पूरक मागणीव्दारे अर्थसंकल्पित रू.२०० कोटी निधीपैकी उर्वरित ३०% च्या मर्यादेत रू.६० कोटी इतका निधी वित्त विभागाने वितरणाकरीता BEAMS प्रणालीवर उपलब्ध करून दिला आहे. सदर रू.६० कोटी इतके अनुदान संबंधित नगरपरिषद/नगरपंचायतींना वितरीत करण्याकरीता नगरपरिषद प्रशासन संचालनालयास वितरीत करण्यात येत आहे.

२. नगरपरिषदांसाठी BEAMS प्रणालीद्वारे प्राप्त झालेले सहायक अनुदान संदर्भिय दि.१६.०६.२०१७ च्या शासन निर्णयानुसार नगर परिषद प्रशासन संचालनालयाने थेट नगरपरिषदा/ नगरपंचायतीच्या बँक खात्यात जमा करावे.

३. सदरचा निधी वितरीत करतांना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि. ०२.०४.२०१८ मधील अटींची पुर्तता केल्यावरच तसेच ७५% उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यावरच सदर निधी संबंधित नगर परिषदांना वितरीत करण्यात यावा.

४. सदरचा निधी मागणी क्रमांक- एफ-२, २२१७, नगरविकास, १९२, नगरपरिषदांना सहाय, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहायक अनुदान, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)(२२१७ ८०६६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

५. महालेखापाल यांच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रांचा आहरण व संवितरण निहाय निपटारा एक महिन्यात करण्यात यावा. सदरची प्रमाणपत्रे अधिदान कार्यालयास सादर न करता ती महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

६. वित्त विभागाच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित संक्षिप्त देयकांचा निपटारा एक महिन्यात करण्यात यावा.

७. नगर परिषद प्रशासन संचालनालयाने अतिप्रदान झालेल्या रकमांची संबधित नगरपरिषदांकडून त्वरेने वसूली करावी. तसेच सदरची वसुली ९११, अतिप्रदानाची वसुली, (००) (०२) अतिप्रदानाची वसूली (योजनेतर) (२२१७९९५७) ७०, वजा वसुली या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

८. सदरील आदेश वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये दिलेल्या अधिकारीतेत निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२११३६३३५२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2019.02.02 11:38:24 +05'30'

**( सचिन सहस्त्रबुद्धे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. सर्व मुख्याधिकारी.
५. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, (पूर्व) वांद्रे, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

१०. कार्यासन व्यय-३/अर्थसंकल्प-१६/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन नवि-४/ कार्यासन नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (नवि-१४).